महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळातील कर्मचाऱ्यांच्या निवृत्तीवेतनाच्या कागदपत्रांच्या छाननीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण -२०१८/प्र.क्र.१८१/एस.डी.२**
**हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय (विस्तार), मुंबई-३२.**
**दिनांक -: ११ सप्टेंबर, २०१८.**

वाचा :१) शासन निर्णय शिक्षण व सेवायोजन विभाग क्र.एसएससी १८८३/२४२६७(८९०६)उमाशि-१, दि.१५.११.१९८५.
२) शासनपत्र वित्त विभाग क्र.सं क्र.संकीर्ण २०१७/प्र.क्र.१०५ /कोषा प्रशा-४,दि.१०.१.२०१८.

**प्रस्तावना -**

संदर्भाधिन शासन निर्णय दि.१५ नोव्हेंबर,१९८५ मधील परिच्छेद क्र.१ अन्वये निवृत्तीवेतन प्रकरणाच्या छाननीबाबत स्पष्ट केले आहे. सदर परिच्छेद क्र.१ नुसार, मंडळ कर्मचाऱ्यांची निवृत्ती वेतनाची कागदपत्रे मंडळस्तरावर तयार केल्यानंतर त्याची छाननी मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक लेखा महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयामार्फत करून घेण्याबाबतची तरतुद केली आहे. तथापि आता संदर्भाधिन वित्त विभागाच्या शासनपत्रान्वये, स्थानिक संस्थांच्या लेखापरिक्षणाची व्याप्ती व संचालनालयाकडे अपुरे मनुष्यबळ पाहता, जिल्हापरिषदेच्या धर्तीवर, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळातील कर्मचाऱ्यांच्या निवृत्तीवेतनाच्या कागदपत्रांची छाननी, त्यांच्या कार्यालयातील महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा संवर्गातील सहायक संचालक (गट-अ) व लेखाधिकारी (गट-ब राजपत्रित) यांच्याकडून करून घेण्याबाबत कळविले आहे. सदर वस्तुस्थितीच्या अनुषंगाने संदर्भाधीन शासन निर्णयातील उपरोल्लेखित तरतूद वगळून सुधारित तरतुद निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन शासननिर्णय दि. १५ नोव्हेंबर १९८५ मधील परिच्छेद क्र.१ मधील महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळातील कर्मचाऱ्यांच्या निवृत्ती वेतनाच्या कागदपत्रांची छाननी मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक लेखा महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयामार्फत करून घेण्याबाबतची तरतूद, या शासन निर्णयान्वये वगळण्यात येत आहे.

आता, निवृत्तीवेतनविषयक प्रकरणांच्या /कागदपत्रांच्या छाननीबाबतची कार्यवाही मंडळातील महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा संवर्गातील लेखाधिकारी (गट-ब राजपत्रित) यांच्यामार्फत करण्यात यावी.

सदरहू शासननिर्णय दि.१५ नोव्हेंबर १९८५ मधील उर्वरित तरतुदी कार्यवाहीत राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९१११११५३३५६३२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Govind Balu Kamble

Digitally signed by Govind Balu Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9197de2bc674839ebe310a15d6bce1dd2d80cb5d5cef5dd249d0ff0f60e4de9d, serialNumber=06b02f2b563d12c922a0a07840d85d1c274f61508e2c94e450344568cfdbe0f5, cn=Govind Balu Kamble
Date: 2018.09.11 17:37:42 +05'30'

**( गोविंद कांबळे )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.अपर मुख्य सचिव,शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मा.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
७. मा.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
८. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
९. सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
१०. शिक्षण संचालक (माध्यमिक/प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे .
११. सर्व विभागीय अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ .
१२. सर्व विभागीय सचिव, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ .
१३. निवड नस्ती, एसडी-२